जिल्हाधिकारी व अपर जिल्हाधिकारी
<u>यांच्यामधील कामाचे वाटप.</u>

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : संकीर्ण-२०१५/प्र.क्र.२८/ई-१अ**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक :- २४ एप्रिल, २०१७.

वाचा :-

१. शासन परिपत्रक, महसूल व वन विभाग क्रमांक : संकीर्ण-०२/ २०११/ प्र.क्र.१३/ई-१, दिनांक २९.०३.२०१२.
२. राज्य निवडणूक आयोग, महाराष्ट्र यांचे आदेश क्रमांक -रानिआ/मनपा-२०१५/ प्र.क्र.६/का-५, दिनांक १०.०२.२०१५.
३. शासन परिपत्रक, महसूल व वन विभाग क्रमांक : एसएनटी-२०१५/प्र.क्र.२८/ई-१अ, दिनांक २५.०५.२०१५.
४. राज्य निवडणूक आयोग, महाराष्ट्र यांचे पत्र क्रमांक -रानिआ/ग्रापनि-२०१२/ प्र.क्र.१२/का-८, दिनांक २८.०८.२०१५.
५. राज्य निवडणूक आयोग, महाराष्ट्र यांचे अ.शा.पत्र क्रमांक -रानिआ-२०१५/१५८/ का-२, दिनांक १६.०६.२०१६.

**परिपत्रक -**

शासन परिपत्रक, महसूल व वन विभाग क्रमांक : एस-१४/३६१६/प्र.क्र.२०९/९१/ ई-३, दिनांक २८.०१.१९९२ अन्वये राज्यातील प्रत्येक जिल्ह्यासाठी अपर जिल्हाधिकाऱ्याचे प्रत्येकी एक पद निर्माण करण्यात आले. शासन परिपत्रक, महसूल व वन विभाग क्रमांक : एस-१४/३६१३/ प्र.क्र.२०९ (२)/ई-३, दिनांक ३०.०४.१९९२ अन्वये जिल्हाधिकारी यांच्याकडील कामाची विभागणी जिल्हाधिकारी व अपर जिल्हाधिकारी यांच्यामध्ये करण्यात आली. तदनंतर आवश्यकतेनुसार विषयवाटपामध्ये वेळोवेळी बदल करण्यात आले. संदर्भ क्रमांक १ येथे नमूद दिनांक २९ मार्च २०१२ रोजीच्या परिपत्रकान्वये जिल्हाधिकारी व अपर जिल्हाधिकारी यांच्यात केलेले विषय वाटप अंमलात आले आहे. सदर परिपत्रकातील विषयवाटपानुसार जिल्हाधिकाऱ्यांकडे सुपूर्द करावयाचे विषय यातील अ. क्र. १२ अनुसार जिल्हापरिषद निवडणूकांचे कामकाज सोपविण्यात आले आहे. त्याचप्रमाणे अपर जिल्हाधिकाऱ्यांकडे सुपूर्द करावयाचे विषयातील अनुक्रमांक ९ अनुसार “मुंबई ग्रामपंचायत अधिनियमाखालील निवडणूकांसह ग्रामपंचायत विषयक सर्व बाबी” हा विषय सोपविण्यात आला आहे.

२. शासनाने संदर्भ क्र.३ येथील दिनांक २५.०५.२०१५ च्या परिपत्रकान्वये, जिल्हाधिकाऱ्यांकडे "जिल्हापरिषद निवडणूका व पंचायत समित्यांच्या निवडणूका तसेच नगर परिषद / नगर पंचायत यांच्या निवडणूका" पार पाडण्याची जबाबदारी सोपविली आणि ग्रामपंचायत निवडणूकांची जबाबदारी पूर्ववत अपर जिल्हाधिकारी यांच्याकडे ठेवण्याचा निर्णय घेतला होता.

३. राज्य निवडणूक आयोगाच्या संदर्भाधीन दिनांक १०.०२.२०१५ व दिनांक ३०.०३.२०१५ च्या पत्रान्वये पाठविलेल्या प्रस्तावांचा सर्वंकष विचार करुन यापुढे जिल्हापरिषद निवडणूका / पंचायत समित्यांच्या निवडणूका व नगर परिषद / नगर पंचायत तसेच ग्रामपंचायत विषयक निवडणूकांच्या सर्व बाबी जिल्हाधिकारी यांच्याकडे सोपविण्यात येत आहेत. त्यामुळे शासन परिपत्रक, महसूल व वन विभाग क्रमांक : संकीर्ण-०२/२०११/प्र.क्र.१३/ई-१, दिनांक २९.०३.२०१२ अनुसार अपर जिल्हाधिकाऱ्यांकडे सुपूर्द विषयातील अ.क्र.९ येथील विषय वगळण्यात येत आहे.

४. सदर परिपत्रक ग्रामविकास विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४१६, दिनांक २८.०९.२०१५ तथा विधी व न्याय विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१२५/B, दिनांक १९.०१.२०१७ यास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेताक क्र. २०१७०४२४१६५५२३३८१९ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Manik Abaji Gutte

Digitally signed by Manik Abaji Gutte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e916069df1a7a7a7d07024f4508c2ec1a57df269bc3fbc07593501473a9fdecc, cn=Manik Abaji Gutte
Date: 2017.04.26 11:39:29 +05'30'

(मा. आ. गुट्टे)
**शासनाचे सह सचिव**

**प्रति,**

१. सचिव, राज्य निवडणूक आयोग, महाराष्ट्र नवीन प्रशासन भवन, मंत्रालयासमोर मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२

२. सर्व विभागीय आयुक्त.

३. सर्व जिल्हाधिकारी

४. उप सचिव, मा.मुख्य सचिव यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
५. मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
६. मा.राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
७. सर्व संबंधित अपर जिल्हाधिकारी (विभागीय आयुक्तांमार्फत)
८. प्रधान सचिव (महसूल) यांचे स्वीय सहायक, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
९. प्रधान सचिव (नगर विकास), यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
१०. प्रधान सचिव (ग्राम विकास विभाग) यांचे स्वीय सहायक, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
११. निवडनस्ती (ई-१अ कार्यासन), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२